पशुवैद्यकीय दवाखाना, श्रेणी-१ चांदूरबाजार, जि. अमरावती या संस्थेचे रूपांतर तालुका लघुपशुवैद्यकीय सर्वचिकित्सालयामध्ये करणे व यासाठी आवश्यक विविध संवर्गातील एकूण ०४ नवीन पदे निर्माण करण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**कृषि, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग,**
**शासन निर्णय क्रमांक- संकिर्ण-२०२०/ प्र.क्र. ४७/पदुम-४**
**मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरू चौक,**
**मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२**
**दिनांक :- १२ ऑक्टोबर, २०२१.**

वाचा : १) कृषि, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभागाचा शासन निर्णय क्र.पसंप्र-१००१ / प्र.क्र. २९ (भाग-४)/पदुम-१, दि.२५.०५.२००४.
२) आयुक्त पशुसंवर्धन, पुणे यांचे कार्यालयीन पत्र क्र. व्हीएचडी/४४/५२३३/२०१५-२०, पसं-१२, पुणे, दि. २८.०८.२०२०.
३) वित्त विभागाचे पत्र क्र.पदनि-२०२०/प्र.क्र.३७/आपुक, दि.१३.०१.२०२१.
४) वित्त विभाग पृष्ठांकन क्र.पदनि-२०२१/प्र.क्र.३९/२१/आपुक दि.२६.०८.२०२१ अन्वये मा.मुख्य सचिव यांच्या अध्यक्षतेखाली दि.१३.०७.२०२१ रोजी आयोजित उच्च स्तरीय सचिव समितीच्या पार पडलेल्या ४ थ्या बैठकीचे इतिवृत्त.

प्रस्तावना -

शेतकरी /पशुपालक यांच्याकडील पशुधनास तज्ञ व अद्ययावत पशुवैद्यकीय सेवा उपलब्ध व्हाव्यात म्हणून वाचा क्र.१ येथील दि.२५.०५.२००४ च्या शासन निर्णयान्वये राज्यामध्ये तालुका लघुपशुवैद्यकीय सर्वचिकित्सालयाची स्थापना करण्याचा निर्णय शासनाने घेतलेला आहे व या संस्थेसाठी सहाय्यक आयुक्त पशुसंवर्धन, गट-अ, ०१ पद, पशुधन विकास अधिकारी (पदवीधर), गट-अ, ०१ पद, पशुधन पर्यवेक्षक, गट-क/वृणोपचारक, गट-ड, ०१ पद, वरिष्ठ लिपीक, गट-क, ०१ पद आणि परिचर, गट-ड, ०१ पद अशा एकूण ०५ पदांचा आकृतीबंद देखील मंजूर करण्यात आलेला आहे.

सद्यस्थितीत चांदूरबाजार येथे तालुकास्तरीय श्रेणी-१ चा पशुवैद्यकीय दवाखाना मंजूर असून, या संस्थेवर पशुधन पर्यवेक्षक, गट-क- ०१ पद, वृणोपचारक, गट-ड-०१ पद आणि परिचर, गट-ड-०१ पद अशी जिल्हा परिषदेकडील ०३ पदे मंजूर असून, सदरची पदे भरलेली आहेत. या तालुकास्तरीय श्रेणी-१ च्या पशुवैद्यकीय दवाखान्यासाठी पशुधन विकास अधिकारी यांचे स्वतंत्र पद मंजूर नाही.

उपरोक्त दि.२५.०५.२००४ च्या शासन निर्णयान्वये तालुकास्तरीय लघुपशुवैद्यकीय सर्वचिकित्सालयाची स्थापना करणेस्तव तालुका मुख्यालयी कार्यरत असलेल्या पशुवैद्यकीय दवाखाना श्रेणी-१ येथील पशुधन विकास अधिकारी संवर्गातील ०१ पद संबंधित तालुका लघुपशुवैद्यकीय सर्वचिकित्सालयामध्ये ठेवण्यास शासनाने मंजूरी प्रदान केलेली आहे. तथापि, पशुवैद्यकीय दवाखाना श्रेणी-१ चांदूरबाजार, जि. अमरावती या दवाखान्यासाठी पशुधन विकास अधिकारी हे स्वतंत्र पद मंजूर नसून, पशुधन विकास अधिकारी (विस्तार), पंचायत समिती, चांदूरबाजार आणि पशुवैद्यकीय दवाखाना श्रेणी-१, चांदूरबाजार या दोनही संस्थांसाठी पशुधन विकास अधिकारी (विस्तार) पंचायत समिती, चांदूरबाजार हे एकच पद मंजूर असल्याने, सदर पदाचे तालुका लघुपशुवैद्यकीय सर्वचिकित्सालय, चांदूरबाजार, जि. अमरावती या संस्थेमध्ये समायोजन करणे आवश्यक आहे.

दि.१३.०७.२०२१ रोजी पार पडलेल्या उच्चस्तरीय सचिव समितीच्या ४ थ्या बैठकीत चांदूरबाजार, जि.अमरावती येथील श्रेणी-१ च्या पशुवैद्यकीय दवाखान्याचे रूपांतर तालुका लघुपशुवैद्यकीय सर्वचिकित्सालयामध्ये करण्यासाठी विविध संवर्गातील एकूण ०४ नवीन पदे निर्माण करण्यास समितीने मान्यता प्रदान केलेली आहे. पशुवैद्यकीय दवाखाना श्रेणी-१, चांदूरबाजार, जि. अमरावती या संस्थेचे रूपांतर तालुका लघुपशुवैद्यकीय सर्वचिकित्सालयामध्ये करणे तसेच, सदरच्या रुपांतरणासाठी आवश्यक विविध संवर्गातील एकूण ०४ नवीन पदे निर्माण करण्याच्या अनुषंगाने खालीलप्रमाणे शासन निर्णय निर्गमित करण्यात येत आहे.

**शासन निर्णय :-**

पशुवैद्यकीय दवाखाना श्रेणी-१, चांदूरबाजार, जि. अमरावती या संस्थेचे रूपांतर तालुका लघुपशुवैद्यकीय सर्वचिकित्सालयामध्ये करण्यास तसेच, सदरच्या रुपांतरणासाठी आवश्यक विविध संवर्गातील खालीलप्रमाणे एकूण ०४ नवीन पदे निर्माण करण्यास व पशुधन विकास अधिकारी (विस्तार), पंचायत समिती, चांदूरबाजार या पदाचे समायोजन करण्यास देखिल याद्वारे, शासनाची मान्यता प्रदान करण्यात येत आहे.

**<u>नविन पदनिर्मीतीचा तपशिल</u>**

| अ.क्र. | नव्याने निर्माण करावयाच्या पदाचे पदनाम | सातव्या वेतन आयोगानुसार वेतनश्रेणी | आकृतीबंधाप्रमाणे नव्याने निर्माण करावयाच्या पदाची संख्या | शेरा |
|---|---|---|---|---|
| १ | सहाय्यक आयुक्त पशुसंवर्धन, गट-अ | एस-२२: (रू.६००००-१९०८००) | ०१ | सदरचे पद नव्याने निर्माण करावयाचे आहे. |
| २ | पशुधन विकास अधिकारी, गट-अ (पदवीधर) | एस-२०: (रू.५६१०० - १७७५००) | ०१ | पंचायत समिती, चांदुरबाजार, जि.अमरावती येथील पशुधन विकास अधिकारी (विस्तार) हे पद समायोजनाने उपलब्ध होईल. |
| ३ | पशुधन पर्यवेक्षक, गट-क | एस-८: (रू.२५५००-८११००) | ०१ | सदरचे पद नव्याने निर्माण करावयाचे आहे. |
| ४ | वरीष्ठ लिपिक, गट-क | एस-८: (रू.२५५००-८११००) | ०१ | सदरचे पद नव्याने निर्माण करावयाचे आहे. |
| ५ | परिचर,गट-ड | एस-१: (रू.१५०००-४७६००) | ०१ | सदरचे पद नव्याने निर्माण करावयाचे आहे. |

सहाय्यक आयुक्त पशुसंवर्धन, तालुका लघुपशुवैद्यकीय सर्वचिकित्सालय, चांदूरबाजार, जि. अमरावती यांना उपकोषागार, चांदुरबाजार येथुन वेतन व भत्ते आहरित करण्यासाठी याद्वारे, आहरण व संवितरण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे.

नविन पदनिर्मीतीच्या वेतन व भत्यावरील खर्च पुढील नमुद लेखाशिर्षांतर्गत खर्ची टाकण्यात यावा.

**लेखाशिर्ष**

मागणी क्र.डी-४,
२४०३, पशुसंवर्धन
१०१, पशुवैद्यकीय सेवा व पशुआरोग्य,
(०२), पशुवैद्यकीय सर्वचिकित्सालये,
(०२) (०१), पशुवैद्यकीय सर्वचिकित्सालये (अनिवार्य)
संकेतांक २४०३०१५१

सद्यस्थितीतील पशुवैद्यकीय दवाखाना श्रेणी-१, चांदूरबाजार, जि. अमरावती या संस्थेवर कार्यरत असलेली पशुधन पर्यवेक्षक, गट-क- ०१ पद, वृणोपचारक, गट-ड-०१ पद आणि परिचर, गट-ड-०१ पद ही जिल्हा परिषदेकडील ०३ पदे जिल्हा परिषद, अमरावतीकडे वर्ग करण्यात यावीत.

सहाय्यक आयुक्त पशुसंवर्धन, गट-अ, पशुधन पर्यवेक्षक, गट-क, वरिष्ठ लिपीक, गट-क, आणि परिचर, गट-ड ही ०४ नवनिर्मित पदे भरण्यासंदर्भात आयुक्त पशुसंवर्धन, महाराष्ट्र राज्य, पुणे यांनी आवश्यक ती कार्यवाही तात्काळ करावी.

हा शासन निर्णय वित्त विभागाचे अनौपचारिक संदर्भ क्र. २८२/आपुक दि.१३.१०.२०२० यांच्या सहमतीने तसेच, वित्त विभाग पृष्ठांकन क्र.पदनि-२०२१/प्र.क्र.३९/२१/आपुक दि.२६.०८.२०२१ अन्वये निर्गमित करण्यात आलेल्या मा.उच्च स्तरीय सचिव समितीच्या मंगळवार दि.१३.०७.२०२१ रोजी पार पडलेल्या ४ थ्या बैठकीत उक्त नवीन पद निर्मितीस प्रदान करण्यात आलेल्या मान्यतेअन्वये निर्गमित करण्यात येत आहेत.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध असून त्याचा संगणक सांकेताक २०२११०१२१५१४०७९७०१ आहे. सदर शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करून निर्गमित करण्यात येत आहे,

**महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,**

VIKAS TULSHIRAM KADAM

Digitally signed by VIKAS TULSHIRAM KADAM
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=AGRICULTURE AND ADF DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=9869ec61c857e78e82b7a19b04c6d22f8ef1b8dbc9b19d45ef776d80ef148059, pseudonym=DC507174367F67372038B4A3876B5734B8B7FD46, serialNumber=406CB152E109154A7466C0050F88E5A437E1783897382468765 3A5E8D144B72B, cn=VIKAS TULSHIRAM KADAM
Date: 2021.10.12 15:18:01 +05'30'

**( विकास तु.कदम )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत-**

१. मा.मंत्री (पशुसंवर्धन) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय मुंबई
२. मा.राज्यमंत्री (पदुम) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय मुंबई
३. आयुक्त पशुसंवर्धन, पशुसंवर्धन आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे
४. प्रादेशिक सहआयुक्त पशुसंवर्धन, अमरावती विभाग
५. मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, अमरावती
६. प्रधान महालेखापाल (लेखापरिक्षा) -१/२ महाराष्ट्र, मुंबई / नागपुर.
७. प्रधान महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता) -१/२ महाराष्ट्र, मुंबई / नागपुर.

८. जिल्हा पशुसंवर्धन उपायुक्त, अमरावती
९. जिल्हा नियोजन अधिकारी, जिल्हाधिकारी कार्यालय, अमरावती
१०. जिल्हा पशुसंवर्धन अधिकारी, जिल्हा परिषद, अमरावती
११. वित्त विभाग (कार्यासन आपुक) मंत्रालय, मुंबई
१२. उप कोषागार अधिकारी, चांदूरबाजार, जि. अमरावती
१३. अवर सचिव (पदुम-३) / कक्ष अधिकारी (पदुम-१), कृषी व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई.
१४. निवडनस्ती पदुम-४